**बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ अंतर्गत वंचित व दुर्बल घटकातील विदयार्थ्यांसाठी राखीव असलेल्या २५% जागांवर प्रवेशित विदयार्थ्यांच्या शैक्षणिक शुल्काची प्रतिपूर्ती करण्यासाठी निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आरटीई-२०१८/प्र.क्र.३१२/एस.डी.-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: २७ डिसेंबर, २०१८

**वाचा -**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२/०४/२०१८
२) शासन परिपत्रक क्र.आरटीई-२०१८/प्र.क्र.२४५/एस.डी.-१, दि.०१/११/२०१८
३) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.प्राशिसं/२५टक्के/२०१८-१९/२०१/४७१६, दिनांक १५/११/२०१८

**प्रस्तावना-**

बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ मधील कलम १२(१) (c) नुसार खाजगी विनाअनुदानीत शाळांमध्ये Entry Level ला २५% जागा वंचित व दुर्बल घटकातील मुलांसाठी राखीव ठेवण्याची तरतूद असून या अधिनियमातील कलम १२(२) नुसार २५% प्रवेशित बालकांचे प्राथमिक शिक्षणाच्या शुल्काची प्रतिपूर्ती करण्याची तरतूद आहे. सन २०१८-१९ या वर्षाच्या अर्थसंकल्पामध्ये सदर बाबीकरिता रुपये १५० कोटी इतका निधी मंजूर करण्यात आला आहे. यापैकी ७० टक्के निधी, रुपये १०५ कोटी वितरणासाठी उपलब्ध आहे. सदर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याचा शासन निर्णय खालीलप्रमाणे आहे.

**शासन निर्णय-**

बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ मधील कलम १२(१)(c) नुसार खाजगी विनाअनुदानीत शाळांमध्ये वंचित व दुर्बल घटकातील विदयार्थ्यांसाठी राखीव असलेल्या २५% जागांवर प्रवेशित विदयार्थ्यांच्या शैक्षणिक शुल्काची प्रतिपूर्ती करण्यासाठी रु.१०५ कोटी (अक्षरी रुपये एकशे पाच कोटी फक्त) इतका निधी शिक्षण संचालक (प्राथ.), महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडे सुपूर्द करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच क्षेत्रिय स्तरावर अखर्चित असलेला निधी प्रलंबित दायित्वाची पूर्तता करण्यासाठी खर्च करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. शिक्षण संचालक (प्राथमिक) यांनी ज्या जिल्हयांची मागणी जास्त आहे त्या जिल्हयांची उतरत्या क्रमाने यादी करावी व मागणीच्या प्रमाणात निधी वितरित करावा.

**३.** सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे. तसेच शासन परिपत्रक दिनांक १ नोव्हेंबर, २०१८ रोजी दिलेल्या निदेशानुसार शाळांना शैक्षणिक शुल्क प्रतिपूर्ती अदा करण्याची कार्यवाही करावी.

**४.** शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जिल्हा परिषद यांनी प्राप्त झालेला निधी ज्या शाळांचा निधी अधिक प्रमाणात थकित राहिला आहे अशा शाळांना प्राधान्याने वितरित करावा. याकरिता संबंधित जिल्ह्यांनी RTE प्रवेशाची यादी NIC पोर्टल वर अपडेट करावी. तसेच ज्या शाळांमध्ये अधिक प्रवेश झाले आहेत, त्याची उतरत्या क्रमाने यादी तयार करुन त्या क्रमाने जिल्ह्यांनी निधी वितरित करावा.

**५.** सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.०२/०४/२०१८ रोजीच्या परिपत्रकास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. वित्त विभाग शासन परिपत्रक दिनांक ०२/०४/२०१८ मधील अटींची पूर्तता होत आहे. तसेच परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ८ मधील १ ते ४ व ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ५ ते ८ व १० मधील बाब या आदेशासाठी लागू नाही.

**६.** सदर खर्च वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.०२/०४/२०१८ रोजीच्या परिपत्रकातील सूचनानुसार करण्यात यावा. यासाठी शिक्षण संचालक (प्राथ.), महाराष्ट्र राज्य, पुणे, शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जिल्हा परिषद सर्व, विभागीय शिक्षण उप संचालक, मुंबई विभाग, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त (शिक्षण) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी वितरणाचे उपयोगिता प्रमाणपत्र शिक्षण संचालक (प्राथमिक) यांनी माहे मार्च, २०१९ अखेर शासनास सादर करावे.

**७.** सन २०१८-१९ या चालू आर्थिक वर्षाकरिता "मागणी क्रमांक: ई-२, २२०२ - सर्वसाधारण शिक्षण- (०१) प्राथमिक शिक्षण, १०३ प्राथमिक शिक्षणासाठी स्थानिक संस्थांना सहाय्य (०१) (१९) २५% विदयार्थी कोटा प्रवेशातंर्गत शाळांना करावयाची प्रतिपूर्ती (२२०२ H८७५), ३१ सहायक अनुदाने" या लेखाशीर्षांतर्गत रुपये १५० कोटी इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. सदर तरतूदीमधून यावर होणारा खर्च भागविण्यात यावा.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८१२२७१२३८२५७८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suvarna Siddharth Kharat

Digitally signed by Suvarna Siddharth Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=065279b98828b1456ad0d62a97fa45eee948af8abe5a27104d4e132c5bd1d93a, cn=Suvarna Siddharth Kharat
Date: 2018.12.27 12:43:39 +05'30'

**( डॉ.सुवर्णा खरात)**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मंत्री (शालेय शिक्षण व क्रीडा) यांचे खाजगी सचिव
३. मा. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
५. मा.राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई.
६. शिक्षण संचालक (प्राथ.), महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
८. महालेखापाल (लेखा परीक्षा) १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
९. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई - ६३
१०. सर्व वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण विभाग) सर्व
११. जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व
१२. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
१३. सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जिल्हा परिषद
१४. वित्त विभाग (व्यय-५/अर्थ-८), मंत्रालय, मुंबई
१५. शालेय शिक्षण विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई
१६. निवड नस्ती (एस.डी.१).